**संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्या कार्यालयातील ४२ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपदे २०१८/प्र.क्र.९५ /आरोग्य-३ अ

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई ४०० ००१
तारीख: २३ ऑक्टोबर २०१८

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे २०१८/प्र.क्र.९५/आरोग्य-३ अ, दि. ३ एप्रिल,२०१८
२) सहसंचालक,(अ व प्र),मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष ५/टे-३/४२अपदे/५३९७/१८ दि.६/९/२०१८
३) शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.७/९/२०१८

**शासन निर्णय-**

संदर्भाधिन क्र.१ येथील शासननिर्णय क्र.अपदे २०१६/प्र.क्र.१७३/आरोग्य-३ अ, दि.३ एप्रिल,२०१८ अन्वये संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्या कार्यालयातील ४२ अस्थायी पदे चालू ठेवण्यास दि.१/३/२०१८ ते दि.३०/९/२०१८ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरुन सदर पदांना दि.१/१०/२०१८ ते दि.२८/२/२०१९या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर अस्थायी पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नसल्याचे प्रस्तावात नमूद करण्यात आले आहे. सदर पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांची राहील या अटीच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन शासननिर्णयात नमूद केलेल्या मंजूर पदांचा आकृतीबंध मंजूर करुन घेण्याच्या अटींच्या अधीन राहून, सदर ४२ अस्थायी पदांना, या शासन निर्णयान्वये दिनांक १/१०/२०१८ ते दिनांक २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खाली दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागवण्यात यावा.

मागणी क्रमांक आर-१
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
०११ -संचालन व प्रशासन,
००१ (१)-आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई (२२१० ००९३)
मागणी क्रमांक आर-१
२५-२०७०-इतर प्रशासकीय सेवा
१०६ - नागरी संरक्षण,१०६ (१)वैद्यकीय सेवा (२२७० ०२३६)
मागणी क्रमांक आर-१
२२१०- वैद्यकीय आरोग्य,०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ -संचालन व प्रशासन००१ (२)-प्रादेशिक कार्यालय(२२१० ०३५१)
मागणी क्रमांक आर-१
२२१०- वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्य
०६ सार्वजनिक आरोग्य,००१ -संचालन व प्रशासन
००१ (१)-सहसंचालक आरोग्य सेवा संचालनालय,पुणे (२२१० ०३४२)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ७ सप्टेंबर ,२०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१६५४५५६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.10.23 16:29:01 +05'30'

**(रा.शा.कौरते)**
(अवर सचिव, महाराष्ट्र शासन)

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व लेखापरिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर

२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
५. वित्त विभाग (व्यय १३)/वित्तीय सुधारणा-१,/आ.पु.क. मंत्रालय, मुंबई
६. अवर सचिव (सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती (आरोग्य-३ अ)